# जातीय दंगली व आपली जबाबदारी

लेखक : इनआमुर्रहमान खान
अनुवादक : अब्दुल हमीद शेख

*॥ अल्लाह, असीम, दयावंत व कृपावंतच्या नावाने ॥*

# जातीय दंगली व आपली जबाबदारी

**वयोवृद्ध लेखकाचा हा लेख, फेब्रुवारी १९६४ च्या मासिक 'जिंदगी' मध्ये प्रकाशित झाला होता. त्याच्या काही दिवसांपूर्वीच भोपळ मध्ये जातीय दंगलीचा उद्रेक झाला होता. त्यामुळेच या लेखाला प्रेरणा मिळाली होती. या लेखाचे देशव्यापी महत्व त्या काळीही होते आणि आज तर त्याचे महत्व आणखी वाढलेले आहे.**

देशात जातीय दंगलींचे जे चक्र चालू आहे, ते तत्कालिक आहे असे वाटत होते. देशाला स्वातंत्र्य मिळवून देण्याच्या प्रयत्नात ज्या जाती परस्पराविरुध्द उभ्या टाकल्या होत्या, त्यांच्या भावनांचा तो तात्कालिक उद्रेक आहे आणि काळ लोटल्याबरोबरच तो उद्रेकही थंड होईल, असे वाटत होते. तसे घडले नाही. ही एक दु:खद गोष्ट आहे. जातीय दंगलींचे चक्र सतत चालू राहिले. आता या दंगलींचे स्वरुप असे झाले आहे, की पोलीस बळ आणि पुढाऱ्यांची आवाहने, त्यांचे निवारण करण्यास अपुरे पडत आहेत, किंबहुना ही समस्या इतकी संवेदनशील व गांभीर्याची बनली आहे की, ज्या लोकांना त्यांची कटुता व असहनीयता जाणवते, त्यांच्यासाठी हे आवश्यक झाले आहे की त्यांनी केवळ आवाहने करण्यापुरते व आवाहने ऐकण्यापुरते मर्यादित राहू नये. तर ज्या कारणांनी ही अवस्था निर्माण केली आहे, त्या कारणांचा गंभीरतेने शोध घ्यायला हवा. पुढे त्या कारणांवर केवळ टीका व निर्भर्त्सना करुनच थांबू नये. तर सहृदयपणे त्यांचे निवारण करण्याची काळजी घ्यावी आणि दंगल भडकावण्यात दंगलखोर समाजकंटक जो उत्साह दाखवितात, त्यापेक्षा अधिक उत्साहाने व आस्थेने त्यांनी पुढे यावे.

वर्तमान अवस्थेचे कारण केवळ ऐतिहासिक नाही किंवा केवळ सामायिक नसून, त्यात दोन्ही प्रकार आहेत. हे थोडासा विचार केल्यास समजून येते. दंगलींची काही कारणे ऐतिहासिक सैध्दान्तिक आहेत. ती एका क्रमाने निर्माण होत असतात व वाढत वाढत ती इतकी विस्फोटक बनली आहेत की सामायिक किंवा आकस्मिक कारणांची एक लहानशा ठिणगीनेही भडका होऊ शकतो. सर्वदूर क्षेत्रापर्यंत तो पोचून जनतेचे जीवित - वित्त व अब्रू आणि राष्ट्रीय हितांच्या अनेक बाबींनाही भस्म करून टाकतो. ही परिस्थिती बदलून शांती व सद्‌भावनेचे वातावरण निर्माण करायचे असेल तर, देशाच्या शरीरावर उठणाऱ्या या वैरभावी गळूंवर मलमपट्टी करायलाच हवी. शिवाय ज्या विषारी घटकांमुळे राष्ट्ररुपी शरीरातील रक्त दूषित होऊन हे गळू उठत आहेत आणि अन्य रोग निर्माण होत आहेत, त्यावरही उपचार केल्याविना याला दुसरा कोणताही मार्ग नाही.

# ऐतिहासिक कारण

पाश्चात्य शिक्षण आणि सभ्यता यांच्या प्रभावानेच देशात राजकीय जागृतीचा आरंभ झाला, ही गोष्ट सर्व लोक जाणतात. या पाश्चात्य शिक्षणाने आणि सभ्यतेने ज्या देणग्या आपल्या देशाला दिल्या आहेत, त्यापैकी दोन अशा आहेत, ज्यांनी आपल्या देशाचे वास्तविक चारित्र्य निर्माण केले आहे. एक म्हणजे उग्र राष्ट्रवादी भावना आणि दुसरी म्हणजे भौतिकवादावर आधारलेली नैतिकता. पहिली गोष्ट घेऊन आपल्या नीतीनिर्मात्यांनी भारतीय राष्ट्रीयता साकार करण्याचा प्रयत्न केला. परंतु त्यासाठी काही ठोस आधार नसल्याने राष्ट्रीयता जागृत करण्याचे काही प्रयत्न केले गेले. त्यांच्या परिणामस्वरुप, ज्यांच्यात जातीयतेची विचारधारणा मुळातच होती, अशा भिन्न जातींच्या समूहांमध्ये आपली वेगळी अस्मिता जपण्याचा विचार जागृत झाला. राजकीय स्वातंत्र्यप्राप्तीच्या संघर्षात ब्रिटीश सत्तेविरुध्द लढा जितका तीव्र होत गेला, त्याचबरोबर ती अधिक कटू बनत गेली. त्यानंतर जेव्हा स्वातंत्र्य मिळाले, तेव्हा शासन सत्ताप्राप्तीसाठी प्रचंड अहमहमिका सुरु झाली. धर्मनिरपेक्ष लोकतांत्रिक पद्धतीचा आत्माच असा आहे की मतांच्या प्राप्तीखातर नवनवे द्वेष - तिरस्कार व वैरभाव निर्माण केला जातो. अशा प्रकारे देशात एकाऐवजी अनेक लहानमोठ्या राष्ट्रीयता निर्माण झाल्या. त्यापैकी काही साकार होऊन आपले खेळ खेळत राहिल्या आहेत आणि शेष काही प्रांतीय अथवा भाषिक राष्ट्रीयता अद्याप निर्माणावस्थेतच आहेत. त्यापैकी एका जातीसमूहाचा दुसऱ्या जातीसमूहाच्या जातीय अगर धार्मिक आशा-आकांक्षांविरुद्ध कटुता व विरोध वाढीस लागतो. त्याचप्रमाणात जातीयतेची आग भडकत जाते आणि त्यांच्यामध्ये वैरभाव व आकस वाढत जातो.

ब्रिटिशांची दुसरी देणगी अशी की पाश्चात्यांच्या शिक्षणाने आणि त्यांच्या संस्कृतीने भौतिकवादी नैतिकतेचे जे धडे आम्हाला दिले आहेत, ते एखाद्या पिसाळलेल्या कुत्र्याच्या विषाप्रमाणे संपूर्ण देशाच्या नसानसात पूर्णपणे भिनून अभिसरण करीत आहे. त्या विषाने माणसांच्या मन-मस्तकातून ईशभय

आणि सत्यप्रियता, यांचे उच्चाटन केले आहे, सज्जनतेची आणि मानवतेची पाळेमुळे उखडून टाकली आहेत. आपल्या प्राचीन धर्मापासून जी नीतिमूल्ये मान्यता पावून देशवासियांनी आपल्या आचरणात आणली होती, त्या नैतिक सदाचरणांची वाट लावून टाकली. या नव्या नैतिकतेच्या फलस्वरुपच विभिन्न जातीसमूह नीचतेच्या अधिकाधिक खालच्या पातळीवर जात आहेत. प्रामाणिकपणा व श्रध्दा कोळून पिऊन मोठमोठे पुढारी स्वहितासाठी, आपले घर भरण्यासाठी, लाज सोडून अधिकाधिक

खालच्या पातळीवर उतरु लागले आहेत. मोठमोठे जबाबदार राजकीय पक्ष सत्यतेकडे व न्यायप्रियतेकडे पूर्णपणे डोळेझाक करुन, एकमेकांविरुध्द फोडाफोडी करण्यात गढलेले आहेत. मोठमोठे मार्गदर्शक अत्यंत निर्लज्ञपणे शिवराळ भाषा व निखालस खोटारडेपणाचे वादंग माजवीत, लोक वैर–वैमनस्याची झिंग आणून आपल्या जातीसमूहाला अनावर करुन सोडत आहेत. शासकीय कारभारात, बाजारात आणि जीवनाच्या प्रत्येक अंगात अन्याय आणि अप्रमाणिकपणा ठकबाजी होत आहे. व्यक्तिगत अथवा आपल्या समूहाचा स्वार्थ, हाच प्रत्येक व्यक्तीचा ईश्वर बनला आहे, त्यामुळेच देशाच्या सर्व योजना आणि देशाचे साहस नष्ट करुन टाकले आहेत. नैतिकता व मानवतेचे उगमस्थान असणारी पूजा व प्रार्थनास्थळे व धर्म, यांनाही आपल्या स्वार्थाचे साधन बनवून तेथेही अमंगल घाण पसरवून अपवित्र करीत आहेत. ही सर्व त्याच भौतिकवादी नैतिकतेची फळे आहेत.

उग्र राष्ट्रवाद आणि भौतिकवादी नैतिकतेची जी देणगी आम्ही पाश्चिमात्यांकडून मिळविली आहे आणि त्याने आपला देश नरक करुन टाकला आहे. त्यांच्या घटनाक्रमाने हे कळून चुकले की हे नैतिक अध:पतन देशाला अधोगतीच्या भयानक गर्तेत लोटल्याशिवाय राहणार नाही. त्यावर जर गंभीरपणे विचार करुन प्रतिबंधक ठोस कृती झाली नाही, तर काळ्या दगडावरच्या रेषेइतकी ती गोष्ट अटळ आहे. यावर खरा उपाय म्हणजे विभिन्न संस्कृतींना एक ठिकाणी वाटून व ते मिश्रण एकजीव करुन त्याला ‘राष्ट्रीय एकतेचे’ गोंडस नाव देऊनही होणार नाही किंवा जीवनमानाचा स्तर उंचावण्याचा नारा दिल्यानेही होणार नाही. त्यावर खराखुरा उपाय तर असा आहे की जातीसमूहाच्या भक्तीऐवजी ईशभक्ती आणि मानवतेच्या श्रध्देचा स्वीकार केला जावा. भौतिकवादी नैतिकतेच्या जागी ईश्वरवादी नैतिकतेचा अंगिकार केला जावा.

वर जे काही सांगितले गेले आहे. त्याखेरीज अन्य काही कारणे आणि प्रेरक शक्ती समजून घेणे गरजेचे आहे. ते स्थानिक बिघाडांशी मिसळून, जातीय तणावाची वादळे उभी करीत असतात.

# तत्कालीक कारणे

जनसामान्यांच्या मानसिकतेचा विचार केल्यास त्यांच्यात दंगल करण्याची किंवा रक्तपात करण्याची इच्छा आढळून येत नाही. त्यांचा स्थायीभावच अशा प्रकारच्या पाशवीपणाला नकार देत असतो. उपद्रव निर्माण करण्यात त्यांना गोडी वाटत नाही. उलट उपद्रवाबद्दल त्यांच्या मनात भयाची भावना आढळते. दुसरीकडे उच्च व समंजस वर्गालाही जातीय उपद्रवाबद्दल घृणा वाटत असते. जनसाधारण अतिउच्च समंजस वर्ग, या दोन्ही प्रकारच्या माणसांना जातीय उपद्रवाची इच्छा नसते, तर प्रश्न असा उद्भवतो की हे जातीय उपद्रव का निर्माण होतात? वास्तविकता अशी आहे की प्रत्येक जातीसमूहात असा एक उपद्रवकारी अंश आढळतो, ज्यांना गुन्हेगारी कृत्ये करण्यास मोठे आकर्षण असते व त्याचबरोबर दंगलीमध्ये लुटालूट करुन बेसुमार धन-संपत्ती गोळा करण्याची संधी त्यांना मिळत असते. या दोन्ही प्रेरणा मिळून त्या उपद्रवप्रिय समाजकंटकांना, जातीय दंगली भडकविण्यासाठी उद्युक्त करतात. दंगल सुरु होईपर्यंत हे लोक पडद्यामागे राहून, लोकांच्या भावना चेतवून व त्यांच्या मानसिकतेचा विस्फोट करणारी वक्तव्ये करुन वातावरण अधिकाधिक तापवीत राहतात. हे कार्य इतक्या चलाखीने व धूर्तपणाने केले जाते की त्यांच्या कुटिल-कारवाया समजणे, जनसामान्यांना तर कठीण असतेच, पण समंजस जनविशेषांनाही त्यांचे आकलन अवघड होते. हिंसाचाराचा प्रत्यक्ष उद्रेक जेव्हा आरंभ होतो, तेव्हा आपल्या अंगच्या विशेष गुणवत्तेमुळे, हा उपद्रवप्रिय जनसमूह दंगलीची सूत्रे आपल्या हातात घेतो किंवा जनसामान्यच मजबूर होऊन दंगलीचे नेतृत्व त्यांच्या हाती सोपवितो. असे झाले म्हणजे संपूर्ण परिस्थिती त्या उपद्रवकारी समाजकंटकांच्या ताब्यात येते. असे झाल्यावर समाजातील महान दिग्गजही त्यांच्याविरुध्द 'ब्र' काढू शकत नाहीत.

१. लोकांच्या भावना जास्तीत जास्त भडकविणाऱ्यांसाठी निरनिराळ्या क्लृप्त्या योजणे, दुसऱ्या समूहाला भयांकित करण्यासाठी धमक्या देत राहणे, विरोधी समूहाने दंगलीची किती जय्यत तयारी केली आहे हे भासविण्यासाठी धादांत खोट्या अफवा ते पसरवितात. आपल्या जातीसमूहास भ्याड, डरपोक असे संबोधून त्यांची अस्मिता डिवचत राहाणे, विरोधी जातीसमूहाच्या तथाकथित अपराधांवर सतत प्रक्षोभ निर्माण करणारी वक्तव्ये करुन निराधार अफवा पसरविणे अशा ललितकलांचे सर्व गुण, या विघ्नसंतोषी समूहामध्ये ठासून भरलेले असतात.

२. सर्वसाधारपणे या प्रलयंकारी जातीय दंगलींची सुरुवात अफवांमुळे होत असते.

या अफवांना जन्म देणारे कारागीर इतके निपुण असतात की जनसामान्यांची मानसिकता दृष्टीसमोर ठेवून अशा प्रकारच्या अफवा पसरवितात ज्या ऐकल्यानंतर विवेकशक्ती, संयम व भान राखणे होत नाही. अफवामुळे निर्माण होणारा हा भयावह प्रक्षोभ इतका तीव्र व प्रबळ असतो की त्याला आवर घालणे राजकीय पक्षांच्या व शासकीय तंत्रांच्या काबूत राहात नाही.

३. मानसिक व व्यावहारिक प्रशिक्षणाचा जनसाधारण व जनविशेष या दोहोंचा अभाव, या उपद्रवकारी घटकांना फार मोठ्या प्रमाणात सहाय्यभूत ठरत असतो. काही माणसे दुष्ट हेतुने नव्हे तर केवळ प्रशिक्षणाअभावी सनसनाटी अफवा पसरविण्यात सक्रिय असतात. भली व समंजस माणसेसुध्दा इच्छा, अनुमान व सूचना यांच्यातील फरक समजून न घेतांना आढळतात. आपले अनुमान अगदी बातमी असल्यासारखे सांगतील त्याचप्रमाणे दुसऱ्या माणसाच्या अनुमानावर बातमी असल्याप्रमाणे विश्वास ठेवतील.

४. या मानसिक व व्यावहारिक प्रशिक्षणाचे एक स्वरुप भ्रम आणि भित्रेपणा आहे. भयाची अवस्था आपल्या भ्रमांना व कल्पनाशक्तीला ताणून व वाढवून विविध प्रकारच्या संशयांना व कुविचारांना जन्म देत असते. असे लोक काल्पनिक संकटाने भयभीत होऊन मुकाबला करण्यासाठी जय्यत तयारी सुरु करतात. जी तयारी भयाच्या भावनेने सुरु केली जाते, ती मैदानात टिकू शकत नाही, हे उघड आहे. म्हणूनच तो उपद्रवकारी भ्याड वर्ग दंगलीमध्ये महत्त्वपूर्ण कार्य करुन जातो. प्रथम दंगलीची तयारी केली जाते आणि जेव्हा तिचा भडका उडतो, तेव्हा या भयग्रस्त लोकांमध्ये जे सज्ञन व सभ्य असतात, ते गप्प बसून राहातात. पण त्यांच्यात जे विघ्नसंतोषी व उपद्रवी घटक असतात, ते मात्र या जातीय दंगलरुपी प्लेगचा प्रसार करण्यासाठी उंदरांचे काम करीत राहातात.

५. आपला समाज एक प्रकारच्या कूपमंडूक प्रवृत्तीमध्ये संकुचितपणामध्ये लिप्त आहे. ही हीनभावना आपल्या श्रेष्ठत्वाचा दावा साधारणपणे सततच करीत असते. जे बहुसंख्येत आहेत ज्यांच्यापाशी सत्ता व शस्त्रे आहेत, त्यांनाही या न्यूनगंडाच्या रोगाने ग्रासले आहे. या न्युनगंडामुळे ते आपल्या शक्तीचे कृत्रिम प्रदर्शन वारंवार दर्शवित असतात. दुसऱ्या समूहांनाही शक्तीप्रदर्शन करण्यास उद्युक्त करतो. ज्या जातीसमूहाच्या हातात राजकीय सत्ता आहे त्याला काल्पनिक व चुकीच्या प्रतिष्ठांचे रक्षण करण्यास उद्युक्त करतो. ते सणावाराच्या दिवशी शस्त्रांचे प्रदर्शन व आम रस्त्यावर शस्त्रे चालविण्याचे कसब दाखवितात.

हीच हीनभावना त्यावेळी प्रदर्शनाचे स्वरुप धारण करीत असते. एखादा कफल्लक माणूस कधी कधी आपण श्रीमंत असल्याचा अविर्भाव दाखवित असतो, अगदी त्याच प्रकारची मानसिकता यातही असते.

६. जेव्हा एखादी दंगल घडून येते, तेव्हा जनतेचे तीन गट पडतात. ज्यांच्यामध्ये दंगल चालू असते ते दोन समूह. तिसरा एक बलशाली गट असतो, तो शासकीय कर्मचाऱ्यांचा असतो, परंतु नि:पक्षपातीपणाने कृती करण्याची सर्वाधिक जबाबदारी शिरावर असलेला हा गटही दंगलखोर एका समूहाशी सहानुभूती बाळगून दुसऱ्या समूहाशी आकसाने व वैर वैमनस्याच्या भावनेने कार्य करीत असतो, ही अत्यंत खेदाची गोष्ट आहे. दंगलीशी संबंधित असलेल्या एका जातीसमूहापैकीच हा शासकीय कर्मचारीवर्ग असल्याने त्यांच्या पाशवी कृत्यांमध्ये तो बरोबरीने वाटा उचलत असतो. हा कायदा व सुव्यवस्था राखणारा शासकीय वर्गच भावनावश होऊन किंवा अंतस्थ कारस्थानाने एका बाजूला झुकतो. तो उपद्रव मोडून काढण्याऐवजी शांतता व सुव्यवस्था स्थापन करण्याच्या नावाखाली स्वत:च अत्याचार व विध्वंस करण्यात भाग घेऊ लागतो. या समूहाला शासनाचे कवच - कुंडल लाभलेले असते. शस्त्रास्त्रांनी ते सुसज्ज असतात. म्हणूनच नि:शस्त्र दंगलखोरांपेक्षा या शस्त्रसज्ज पक्षपाती तिसऱ्या समूहाचा प्रभाव दंगलीवर मोठा पडून हाहाकार माजतो. इंग्रज लोकांनी शासकीय खात्यातील लोकांना आणि पोलीसदलाला, आपण शासक आहोत आणि जनता शासित आहे असे प्रशिक्षण देऊन त्यांची मानसिक घडण केली आहे. तसे प्रशिक्षण इंग्रजांच्या हिताचे होते. परंतु अजूनही तोच खाक्या चालू आहे आणि तसेच प्रशिक्षण स्वातंत्र्य मिळून अर्धशतक होत आले तरी चालू आहे आणि ही अत्यंत खेदाची बाब आहे. हा शासकीय समूह स्वत:ला सेवक आणि जनतेला स्वामी मानण्याऐवजी, स्वत:ला शासक व जनतेला शासित समजतो. देशाच्या प्रत्येक भागात पोलीसांचे ज्याप्रकारचे वर्तन समोर येत आहे आणि ज्याबद्दल प्रत्येक वर्गातील लोकांनी आपल्या तक्रारी व गाऱ्हाणी मांडली आहेत, त्या सर्वांचे मुख्य कारण हेच आहे. आता ही गोष्ट सूर्यप्रकाशाइतकी स्वच्छ आहे की ज्या जातीसमहाच्या हातात वृत्तपत्रांपासून ते मशीनगनपर्यंत सर्व सामर्थ्य असेल आणि त्याचबरोबर त्यांची मनमस्तकही आकसाने व वैरभावाने दूषित झालेली असतील, तर आपल्या पक्षपाती कृत्याला न्यायाचे नाव देऊ शकतील आणि आंपल्या अत्याचाराला शांती - व्यवस्था प्रस्थापनाचे नाव देऊ शकतील.

हे काही त्यांना अवघड नाही. हा शासकीय वर्ग जेव्हा स्वत:ला शासक समजतो आणि मोठमोठ्या प्रतिष्ठित आणि आदरणीय व्यक्तींना शासित मानतो, तर त्यांचे स्वागत तो बुटाच्या ठोकरीने करणार नाही, तर काय त्यांना विनंती-आर्जवे करुन करील ? त्यानंतर प्रतिष्ठित माणसांना पोलीस अधिकाऱ्यांनी वारंवार बोलवणे, त्यांना अटक करुन नंतर सोडणे, सोडल्यानंतर पुन्हा अटक करणे, हाही एक विचित्र प्रकार घडत असतो. असे व्यवहार करताना त्यात आपल्या अधिकारशक्तीचे प्रदर्शन, लोकांना भयभीत करुन ठेवणे, जातीयवादी पक्षपात आणि आपण इंग्रजांचे वारस आहोत, हे दाखविण्याची भावना असतेच. त्याचबरोबर बिचाऱ्यांचा मुलाबाळांच्या गरजांची निकड व विवंचना सतत पिच्छा पुरवित असते. देशातील सर्व लोकांप्रमाणे त्यांचे राहाणीमान उंचवायचे असते.

७. लोकतांत्रिक व्यवस्थेमध्ये जनता हीच सर्व शक्तीचे व सत्तेचे उगमस्थान असते. दुसऱ्या शब्दांत असे म्हणता येईल की जनतेच्या डोक्यावर पाय देऊनचं सत्तेच्या खुर्चीवर चढता येऊ शकते. म्हणून अशा जातीय दंगली राजकारणी कार्यप्रणालीसाठी व व्यक्तिगत महत्त्वाकांक्षेची लालसा बाळगणाऱ्यांसाठी एक सुवर्णसंधी असतात. दबलेला जातीयवाद चेतवून प्रक्षोभ निर्माण करणे, नंतर उपदेशपर वक्तव्याचे डोस पाजण्यासाठी पुढे येणे जेथे आग लावून सफलता मिळण्याचा संभव असेल तेथे पेटवून टाकणे, जेथे आग विझवून लोकांची मने जिंकण्याची सफलता मिळू शकते, तेथे आग विझविणे, या सर्व गोष्टी आजच्या धर्मनिरपेक्ष लोकशाहीची हस्तकला व कसब आहे. विभिन्न जातीसमूहामध्येच वैर-वैमनस्याची रस्सीखेच असल्याशिवाय धर्मनिरपेक्ष लोकतंत्राचे काम चालूच शकत नाही. भांडवलदार व श्रमिकवर्गातील संघर्ष, राज्याराज्यातील शांतीभाव व पक्षपात, भाषिक झगडे, जातीयवाद अशा प्रकारचे सर्व कलह, हे वास्तविकत: लोकतंत्रासाठी अगदी आवश्यक व अनिवार्य आहेत. हिंदू लोक मुसलमानांशी भांडत आहेत, अथवा शिखांचा ख्रिश्चनांची कलह चालू आहे, की बंगाली माणसे आसामी लोकांची हत्या करीत आहेत अगर भांडवलदार लोक श्रमिक-मजुरांची हाडे फोडीत आहेत, याच्याशी लोकतंत्राच्या ध्वजधारकांना कसलेही सोयरसुतक नाही. त्यांना केवळ कलह हवा असतो. त्यामुळेच त्यातील एका पक्षाची बाजू उचलून धरुन, देशाची व आपल्या जातीसमूहाची सेवा करण्याची त्यांना संधी मिळत असते.

८. मानसिक व नैतिक अधोगतीच्या अशा वर्तमान स्थितीमध्ये जेव्हा एखादी अप्रिय घटना घडून येते, तेव्हा स्वाभाविकपणे त्या दु:खद घटनेच्या जबाबदारीचे खापर एकमेकांच्या माथ्यावर फोडण्याचे चक्र सुरु होते. प्रत्येक पक्ष आपणास अत्याचारपीडित व निर्दोष असल्याचे आणि विरुध्दपक्षाला अत्याचारी आणि अपराधी असल्याचे सिध्द करण्यात आपले संपूर्ण चातुर्य लावतो. अशा रीतीने एक जातीय दंगल भविष्यकाळातील अनेक दंगलींचे बीजारोपण करते. ज्या लोकांना जातीय दंगल वास्तविकपणे पसंत नसते, ते लोक लोकांची मने जुळविणारी भावनात्मक आवाहने करणे आणि शांतता, सलोखा व बंधुभाव राखण्याची आवाहने करणे, एवढेच पुरेसे मानून संतुष्ट होऊन बसतात. दुसऱ्या पक्षाचे म्हणणे ऐकून व जाणून घेण्याची, त्यांचा दृष्टिकोन जाणून घेण्याची, दुसऱ्या पक्षाच्या भूमिकेत उतरुन त्यांची व्यथा समजून घेण्याचा शांत डोक्याने प्रयत्न करण्याची आवश्यकताच त्यांना वाटत नाही. दुसऱ्यांच्या उणिवा त्यांना दिसतात आणि त्यांचा उल्लेख करतात, त्यांनी स्वत:च्या अंत:करणातही डोकावून पाहावे. इतकेच नव्हे तर जेव्हा आपल्या लोकांच्या उणिवा डोळ्यांसमोर येतात, तेव्हाही ते कबूल करण्याचे धाडस होत नाही.

या व अशा प्रकारच्या अनेक कारणांची शिकवण स्वातंत्र्यपूर्व काळापासूनच्या तत्त्वांमध्ये आणि विचारांमध्ये मिसळून लोकांनी या देशाच्या शरीराची चाळण करुन टाकली आहे. आपल्या देशाचा खंडप्राय विस्तार, येथील नैसर्गिक साधनसंपत्तीची विपुलता आणि भारतीय माणसाच्या मनाची धार्मिक व नैतिक ठेवण लक्षात घेता, या महान देशाची स्थिती अशी होती की ब्रिटिशांच्या देणग्यांबरोबरच प्रगतीशील सामाजिक सिध्दान्त व सात्त्विक नैतिक विचारधारणा असती, तर भौतिकतेत गुरफटलेल्या आणि नैतिक अधोगतीच्या गर्तेत पडलेल्या जगाला, या महान देशाने मानवतेचा धडा देऊ शकला असता. तसे तर आजही आम्ही स्वत:ला आशिया खंडाचे नेते आणि तिच्या फलस्वरुप दररोज घडून येणाऱ्या जातीय दंगलींमुळे आणि विध्वंसामुळे आपल्यातील जाणिवेची मान लाजेने खाली झुकली आहे. तसेच संपूर्ण जगात प्रतिष्ठा व प्रभाव असणाऱ्या देशामध्ये आपले नेते जेव्हा भेटी देतात, तेव्हा बाह्य जगतातही त्यांना लज्जित व्हावे लागते. सत्यप्रियतेच्या दृष्टीने पाहिले, तर या जातीय दंगली, हा एक आरसा आहे. त्या आरशामध्ये प्रत्येक भारतवासी व प्रत्येक समुदाय आपला चेहरा पाहू शकतो. आता या आरशात पाहिल्याने चेहऱ्यावर जे डाग व कलंक दिसतात, ते पुसून चेहरा स्वच्छ करावा अथवा तो आरसाच भिरकावून द्यावे आणि आपल्या अंतरात्म्याला थोपटून झोपी

घालावे हे दोन्हीही पर्याय त्यांच्या हातात आहेत.

दंगलींच्या उपद्रवाची व दुरावस्थेची जबाबदारी माझ्यावर नसून, ती इतरांची ती आहे, असा समज कोणत्याही व्यक्तीने अथवा समुदायाने करुन घेतला असल्यास, तो फसगत व भ्रमात पडलेला आहे. जातीय भावनेच्या विषाने त्याची न्यायबुध्दी कुंटीत झालेली आहे. आपल्या दूषित विचारधारणांच्या वर येऊन पाहिल्यास त्याला दिसून येईल की या जातीयवादरुपी स्नानगृहात जो कोणी प्रवेश करतो, तो मानवतेची नैतिकतेची वस्त्रे काढूनच नग्न बनतो. त्यात काही फरक असलाच तर श्रेणीचा असतो प्रकाराचा नव्हे.

# आशेचा किरण

या भिन्न काळोखात आपणाला एक आशेचा किरण दिसून येतो की आपल्या संपूर्ण लोकसंख्येची मानसिकता नासलेली नाही. प्रत्येक वर्गात अशा माणसांची बरीच मोठी संख्या आहे, जे साधारणत: अनैतिकतेपासून अलिप्त आहेत. तथापि दुर्भाग्याची गोष्ट अशी आहे की आपल्याकडे दुराचारी लोक संगठित होऊन निर्विघ्नपणे आपले कार्य करीत राहातात, परंतु सदाचारी लोक मात्र असंघटित व विखुरलेले आहेत. त्यांच्यात कसलाही संपर्क व संबंध नसतो. त्यांच्यात कसलाही कार्यक्रम नसतो. या कारणांमुळे ते पूर्णत: प्रभावहीन झाले आहेत. आपल्या सभोवताली होणाऱ्या दुष्कृत्यांना पाहून एखादा ईश्वराचा दास कधी कधी कळवळून ओरडून उठतो, परंतु त्याला पाठिंबा देणारा आवाज कोणत्याही दिशेने त्याला ऐकू येत नाही, तेव्हा तो निराश होऊन अगतिकपणे गप्प बसून राहातो. एखादा माणूस सत्य व न्यायाची गोष्ट उघडपणे बोलून जातो, परंतु संघटित असणारा दुराचार, बलपूर्वक त्याचे तोंड बंद करुन टाकतो. मानवतेचा खून होताना पाहताना एखाद्याला सहन होत नाही व त्या दुष्कृत्याच्या विरोधात बोलून जातो. तथापि अत्याचारी संघटनेच्या शक्तीद्वारा त्याला दडपून टाकले जाते. त्याचा असा दु:खद परिणाम पाहून, ज्यांच्या अंत:करणात भलेपणाची धुगधुगी अद्याप कायम असते, तेही गर्भगळीत व भयभीत होऊन जातात. ही अवस्था आता नष्ट व्हायला हवी. आपला देश ईश्वरी कोपचे लक्ष्य ठरावा व त्या कोपात भलेबुरे सर्व लोक भरडून निघावेत, अशी जर आपली इच्छा नसेल, तर अंत:करणात मानवतेबद्दल थोडीशीही कणव असणाऱ्या सर्व लोकांनी खडबडून जागे होऊन उभे राहायला हवे. भलेपणा व सदाचारापासून ज्यांचा संबंध पूर्णपणे तुटलेला नाही, अशा सर्व बंधूंना असे कळकळीचे आवाहन आम्ही करतो की या जातीयतेच्या वावटळीला रोखण्याची त्यांची जबाबदारी त्यांनी जाणावी, त्यांनी आपले स्थान ओळखावे, खोलवर जाऊन त्यांनी परिस्थितीचा आढावा घ्यावा आणि अशा परिस्थितीत काय करायला हवे ? हा प्रश्न त्यांनी आपल्या अंतरात्म्याला विचारावा, उदंडपणा व उद्दामपणाच्या या अवस्थेत कळवळून केवळ स्वस्थ बसून राहायला हवे, की त्याला थोपविण्यासाठी काहीतरी कृती करण्याची आवश्यकता आहे? तसेच आपल्यापैकी प्रत्येकाची या संदर्भात व्यक्तिगत काय जबाबदारी आहे हे ओळखावे.

# राजकीय सत्ता हेच स्वामित्व नाही

आपले जे बंधु राजकीय सत्तेच्या खुर्चीवर विराजमान आहेत, त्यांनी चांगले समजून घ्यायला हवे की ते या देशाचे मालक नाहीत. त्या खुर्चीवर निरंतर बसून राहण्याचा त्यांनी ठेका घेतलेला नाही. ते ईश्वराला या देशाचा स्वामी मानत असोत अथवा जनतेला स्वामी मानत असोत, एक दिवस त्यांना ही खुर्ची सोडावी लागणार आहे. त्या खुर्चीचे कर्तव्य त्यांनी कितपत पार पाडले, या प्रश्नाचे उत्तर त्यांना द्यावे लागणार आहे. ईश्वराला जर ते देशाचा स्वामी मानतात व स्वत:ला त्याचा प्रतिनिधी, त्याच्याबद्दलच्या सर्व उत्तरदायित्वाची नीट जाणीव ठेऊन त्याच्या इच्छेनुसार कार्य केले, तर ती वास्तवतेची स्वीकार ठरेल. तुमचे जीवन एक जबाबदार जीवन ठरेल आणि तुमचा सर्व व्यवहार संतुलित असेल. सत्तेच्या त्या मदापासून तुम्ही पूर्णत: अलिप्त असाल, जी भल्याभल्यावर आपला अंमल चढवून त्यांना मदांध व बेहोश करुन सोडते. तुम्ही जनतेला जर, देशाचे स्वामी मानत असतात, तर तुम्ही जनतेचे प्रतिनिधी या नात्याने काम केले पाहिजे. कसल्या दुष्कृत्याला जनतेने कधी क्षमा दाखविली नाही. तुमच्या प्रत्येक कृतीवर इतिहासकारांची नजर आहे. सद्यस्थितीत दोन्ही गोष्टी तुमच्या आखत्यारीत आहेत. तुम्ही असे कार्यही करु शकता की त्यासाठी अनेक पिढ्या तुमच्या कृत्यांवर अभिमान बाळगतील, इतिहासकार आदरपूर्वक तुमचे नाव उच्चारील. तसेच तुम्ही अशी कृतीही करु शकता, ज्यामुळे तुमच्या नावावर भावी पिढ्या थुंकतील व इतिहासतज्ज्ञ आपल्या कृत्यांना 'काळी कृत्ये' म्हणून संबोधतील नीट ध्यानात ठेवा. सत्तेच्या खुर्चीवर असताना तुम्हाला स्वत:ची जी छबी दिसते, ती तुमच्या प्रतिमेचे खरे चित्र नव्हे. तुमची खरी प्रतिमा उद्या इतिहासकाराच्या लेखणीतून उतरेल. सत्ता मिळविण्याच्या लालसेने झपाटलेल्या आणि त्यासाठी न्याय, अन्याय, उचित, अनुचित या बाबी धाब्यावर बसवून आटापिटा करणाऱ्यांनीही ही गोष्ट चांगली लक्षात ठेवावी.

# बहुसंख्याकांची जबाबदारी

आमच्या बहुसंख्यांक बंधूना असे म्हणणे कदाचित व्यर्थ ठरेल की ईश्वराने हा देश यासाठी तुमच्या स्वाधीन केला आहे की तुम्ही काय कर्तृत्व करुन दाखविता. तुमचा तर असा समज आहे, की हा महान देश तुमच्या बलिदानांच्या फलस्वरुप तुम्हाला लाभला आहे. तुम्ही तसेच समजत राहा परंतु थोडेसे थांबून हा विचार करा की स्वतंत्र व शासक लोकसमुदायाची जबाबदारी काय असते? त्यांच्यात कोणते गुण असले पाहिजे ? एखाद्या शासकवर्गात सर्वप्रथम आणि सर्वात महत्त्वाचा गुण जो असायला हवा तो औदार्याचा. या मूलभूत गुणांशिवाय वीरता व साहस निर्माण होऊ शकत नाही, जो शासन करण्यासाठी अत्यावश्यक आहे आणि त्यांच्या अभावी कोणताही लोकसमुदाय आजवर कधी विजय मिळवू शकला नाही की श्रेष्ठ राहू शकला नाही. त्याचप्रमाणे सत्तेची नशाही तो पचवू शकलेला नाही. तुम्ही मोठी अनुकंपा दाखवून व तुमच्या गरजांच्या मसलतीनुसार अल्पसंख्याकांना शासनात सहभाग दिल्याचे दाखवित आहात, परंतु प्रत्यक्षात आणि व्यवहारात मात्र तुम्हीच शासकपदावर आहात. म्हणून या देशात वसणाऱ्या अन्य लोकसमुहांपेक्षा तुमची जबाबदारी अधिक मोठी आहे. बहुसंख्यांक असणे ही काही कमालीची गोष्ट नाही. ज्या गुणांमुळे एखाद्या लोकसमूहला आदर व बल प्राप्त होते, ते गुण आपल्यात निर्माण करणे हे वास्तविकत: अधिक भूषणावह आहे. आपण जरा आपल्या अंतरंगात डोकावून पाहावे की ते गुण व वैशिष्ट्ये तुमच्यात आहेत काय? जर असलेच तर अल्पसंख्याकच काय पण जगातील मोठमोठ्या शक्तीही तुमच्याशी टक्कर घेऊन नष्ट होऊन जातील. यासाठी ईश्वराचे आभर मानायला हवेत. पण जर हे भांडवल तुमच्यापाशी नसेल, तर सर्वाधिक चिंता करण्याचा विषय हाच आहे. जातीसमूहांना विजयी करण्यास आवश्यक असणारे हे हत्यार तुम्हाला अमेरिका देणार नाही की अन्य कोणीही देणार नाही. ते हत्यार तर तुम्हाला तुमच्या अंत:करणाच्या मुशीत ओतूनच निर्माण करावे लागेल.

आपण नवनिर्मिती युगातून जात आहोत. अशा प्रसंगी अल्पसंख्याकांना ठेचून काढण्यात आणि बलहीनांना दाबून ठेवण्यात मोठे शौर्य नाही. उलट एक यथोचित दृष्टिकोन बाळगून व औदार्याचे व सहिष्णुतेचे गुण आपल्यात निर्माण करुन आपल्या जातीसमुदायाची उचित जडणघडण करावी. आपल्यात अशी सहृदयता निर्माण करावी की अत्याचारपीडित लोकांनी तुमचा आश्रय शोधावा. प्रामाणिकपणा, प्रांजळपणा व सत्यप्रियतेचे असे गुण आपल्यात उत्पन्न करावेत की परजातीचे लोकही तुम्हावर प्रेम करु लागावेत. तुमच्यात मोठमोठ्या सच्छील व उच्च नीतिचारित्र्याचे लोक नक्कीच आहेत. ही

गोष्ट तोंडपूजा म्हणून केवळ देखाव्यासाठी सांगितली जात नाही. प्रत्यक्षात अशी माणसे अस्तित्वात आहेत. परंतु माफ करा ! तुमचे सामूहिक व्यवहार व वागणूक जी समोर दिसत आहे, ती वेगळीच आहे. ज्या जाती तुमच्यात हजारो वर्षांपासून मिसळल्या आहेत, त्यांनाही तुमच्या व्यवहाराचा उबग येऊन, तुमच्यापासून हळूहळू तुटत आहेत. तुमचा असा व्यवहार पाहून एका विचारवंताने म्हटले आहे, ''त्यांना ईश्वराने सर्व काही दिले आहे, परंतु विशाल हृदय, विशाल दृष्टी आणि उच्च धैर्य दिले नाही.'' काल्पनिक कुशंकेचा वास लागल्याबरोबर तुमची संवेदनशीलता आवश्यकतेपेक्षा अधिक वाढते आणि इतरांना असे म्हणण्याचा अवसर मिळतो की जगात हाच एक असा बहुसंख्यांक जातीसमुदाय आहे, ज्यांना अल्पसंख्यांकांकडून धोक्याची जाणीव होत आहे. ज्या प्राचीन संस्कृतीचे तुम्ही पुनरुज्जीवन करु इच्छिता, त्या संस्कृतीमध्ये निर्बलांना ठेचलेच जाते, त्यांना बंधुभावाने मिठी मारली जात नाही ? अहिंसा, प्रेम व शांती-सलोखा ही वैशिष्ट्ये असलेली तुमची प्राचीन संस्कृती लाठ्यांनी व बंदुकीच्या गोळ्यांनीच पसरते? तुम्हाला ज्यांचा अभिमान वाटतो ते महान वीरपुरुष व योध्दे, असे भयभीत होऊनच राहात होते? आमच्या माहितीनुसार तर त्यांचे तत्त्व असे होते की 'झुकलेल्या शिरांवर व दुर्बल शरीरावर जी तलवार उठते, ती वीरांच्या वर्तनाने व व्यवहाराने तुमचा जो परिचय तुम्ही करुन देत आहात, तो तुमच्या उज्वल संस्कृतीचा खराखुरा परिचय आहे? जरा हाच विचार करा. संपूर्ण देशाला एकात्म करण्याचे स्वप्न तुम्ही तुमच्या हातांनी विखुरत आहात, हे चांगले लक्षात घ्या. तुमच्या भाल्याच्या टोकाने अनेक निद्रिस्त माणसे जागी होतील आणि राष्ट्रीय एकात्मतेचे तुमचे स्वप्न उद्ध्वस्त करुन सोडतील. तुम्हाला मोठेपणाच हवा असेल, तर त्यासाठी केवळ बहुसंख्य असणेच पुरेसे नाही. त्यासाठी विशाल हृदयाची व प्रचंड धैर्याची आवश्यकता आहे. क्षमाशीलतेचे धैर्य नसू दे, कमीतकमी न्यायशक्ती तरी स्वत:मध्ये उत्पन्न करा. अल्पसंख्यांकांना मारून व ठार करुन त्यांना संपवून टाकण्याची तुमच्या मनात सुप्त इच्छा असेल आणि देशात स्मशान शांतता निर्माण करावयाची असेल, तर मात्र आम्हाला काहीही म्हणायचे नाही. तेही करुन पाहा.

# स्वत:चे मोल जाणा

या देशातील अल्पसंख्याकांनी त्यांचे योग्य स्थान कोणते आहे व त्यांनी करण्यायोग्य कार्य कोणते आहे ? याचा नीट विचार करायला हवा. ही गोष्ट खरी आहे की तोंडी काहीही म्हटले जात असले, तरी प्रत्यक्षात देशाच्या शासन व्यवस्थेमध्ये, एक सांस्कृतिक समुदायाच्या नात्याने अल्पसंख्याकांचा कसलाही वाटा नाही. मग काय, केवळ बहुसंख्याकांचे हल्ले थोपविणे आणि शासन-व्यवस्थेत काही हिस्सा मिळविण्यात आपली सर्व शक्ती खर्ची घालणे, इतकेच तुमचे कर्तव्य आहे ? मग देश कोठेही जावो, तुम्ही संख्येने कमी आहात, म्हणून दुर्बल आहात, असा तुमचा समज आहे, परंतु निर्णायक शक्ती ही संख्येचा कमी-अधिकपणा नसून, ती मानवतेच्या गुणांवर असते. संख्या कमी असणे हा अपराध नसून, जगाला देण्यासाठी तुम्हापाशी कोणतीही देणगी नाही, हा वास्तविक अपराध आहे. तुम्हापाशी उन्नत व सच्चरित्र समाज निर्माण करण्याचे सिध्दान्त आहेत आणि आपली तत्त्वे पटविण्यासाठी व आदराचे स्थान मिळविण्यासाठी आवश्यक असणारे नैतिक बल आहे, तर संख्येने तुम्ही कमी असलात तरी पर्वा नाही. कोणत्याही मानवसमुहास वजन व प्रतिष्ठा निर्माण करणारी बाब त्यांची संख्या नसते, तर त्यांच्या जीवनाचे सिध्दान्त व उच्च नैतिक चारित्र्याचे विभूषण मानव-समुदायात वजन व प्रतिष्ठा निर्माण करते. खेदाची गोष्ट अशी आहे की तिकडे तुमची नजर वळत नाही. पहिली गोष्ट अशी आहे की तुमचे दृष्टिकोन व तुमचे व्यवहार यांना आपल्या सांस्कृतिक वर्तुळात वेढून घेतले आहे. फार तर अनेक अल्पसंख्याकांशी संघटन करुन संयुक्त आघाडी उभारण्यापलीकडे तुम्ही जात नाही. हे सर्व उपाय स्वरक्षणाचे आहेत. हे उपाय यशस्वी जरी झाले, तर तुम्ही थोडक्यात अधिक शक्तीनिशी संघर्ष करु शकाल अथवा राजकारणात काही तात्कालिक लाभ मिळवू शकाल, यापेक्षा अधिक काही लाभ होणार नाही. हे नकारात्मक धोरण आहे. एखाद्या संकटाच्या भयाच्या भावनेने जे लोक एकत्र येतात, ते अधिक काळापर्यंत एकत्रित राहू शकत नाहीत. संकट नाहीसे झाले की ते विघटित होऊन विखुरले जातात. तुम्हापाशी जर सामाजिक सिध्दान्त काही सकारात्मक उद्देश व आकर्षून घेण्याची शक्ती नसेल, तर केवळ राजकारणाच्या लाभासाठी एकत्रित येणारे अल्पसंख्याकांचे समूह आपापसात डोकेफोड करुन एक वेगळाच उपद्रव निर्माण करण्यास कारणीभूत होतील. एखाद्या अल्पसंख्य समूहाला जर आदराचे स्थान प्राप्त करायचे असेल, तर त्याला एकच उपाय आहे. त्याने देशापुढे असे तत्त्व मांडावे, ज्यामुळे देशातील सद्यस्थितीतील विघटनवादावर व दुरावस्थेवर उपाय सिध्द होईल आणि त्यांनी स्वत:मध्ये अशी गुणवैशिष्ट्ये निर्माण करावीत ज्यांचा स्वीकार करण्यास जातीयवादी व्यक्तीही बाध्य होईल.

# मुसलमानांनी विचार करण्यासारखा मुद्दा

आता उरली मुसलमानांची बाब. त्याची वास्तवता अशी आहे की विभिन्न ऐतिहासिक आणि भौगोलिक परिस्थितींच्या कारणास्तव याच समुदायाला परिस्थितीचा ताणतणाव व दंगलींचे चटके सर्वापेक्षा अधिक बसले आहेत. त्याची बाह्य कारणे आहेत. तशी अंतर्गत कारणेही आहेत. दुसऱ्यांचा आततायीपणा त्याला कारण आहे, तर स्वत:च्या काही उणिवांही त्याला कारणीभूत आहेत. दुसऱ्यांच्या चुकांबाबतचे विवेचन करायचे तर ते रसभरीत असते यात संशय नाही. त्यावरुन असे वाटू लागते की अपराध आपलो नसून इतरांचा आहे, परंतु हा प्रकार हितकारक नाही. सत्य असे आहे की बल किंवा दुर्बलता, यांचे उगमस्थान आपल्या उद्दिष्टांबद्दल प्रेम असेल आणि नैतिक चारित्र्याचे बल असेल, तर बाह्य परिस्थितीचे महत्त्व कस्पटाइतके असते. ते सुकलेल्या पालापाचोळ्यासारखे असतील तर सोसाट्याचा वारा त्यांना सहज उडवून टाकील. मुसलमानांचा इतिहास साक्ष आहे की त्यांना इतर कोणीही हानी पोहचवू शकला नाही. त्यांनी आपल्या रक्तधमन्या उत्स्फूर्तपणे कापण्यात तत्परता दाखविली आहे. आज देशातील आपल्या अवस्थेवर विचार करा. मुसलमान लोक आजपर्यंत ही गोष्टच निश्चित करु शकले नाहीत की देशात त्यांचे स्थान कोणते आहे. दिवास्वप्नातून बाहेर पडून पाहिले गेल्यास स्पष्टपणे दिसून येईल की येथे मुसलमानांना शासनशक्तीचा दर्जा नाही. गैरइस्लामी सिध्दान्तांचा स्वीकार करून आणि गैरइस्लामी पक्षांच्या शिस्तीच्या बंधनांत बाधा होऊन दोन-चार मुसलमान माणसे शासनाच्या उच्चपदावर बसले, हा शासनामध्ये मुसलमानांचा हिस्सा आहे, याचा पुरावा ठरत नाही. या स्वप्रतारणेने मुसलमानांचे स्थान व त्यांच्या व्यवहाराची प्रकरणे अधिक गुंतागुंतीची करुन टाकली आहेत. त्याहीपेक्षा मुसलमानांची अधिक हानी त्या फसगतीमुळे झाली आहे, जी त्यांनी स्वत:च करुन घेतली आहे. मुसलमान इतर अल्पसंख्याकांप्रमाणे अल्पसंख्य आहेत अगर इतर बहुसंख्याकांप्रमाणे बहुसंख्य आहेत, हे त्यांचे खरेखुरे स्थानच नव्हे. सर्वप्रथम, ते नैतिकतेचे शिक्षक आहेत. मुसलमान लोक अभिमानाने ही गोष्ट अवश्य म्हणतात की 'ते सर्वोत्तम समुदाय (खैरेउम्मत) आहे आणि भल्या कृत्यांचा आदेश देण्यासाठी आणि दुष्कृत्यांचा नायनाट करण्यासाठी त्यांना निर्माण केले गेले आहे. पण त्यांनी सर्वोत्तम समुदाय (खैरेउम्मत) असण्याचा अर्थही पुरेपूर समजून घेतला नाही व प्रत्यक्ष व्यवहारात तशी सेवा देण्याची त्यांची तयारीही नाही. याचाच परिणाम असा निघाला की ज्यांना नीतिचारित्र्याचे पुतळेच नव्हे तर नैतिकतेचे रक्षक असायला हवे होते, त्यांच्या स्वत:ची नैतिकता व चारित्र्य आता लपून राहिलेले नाही. ज्यांना शिसे ओतलेल्या भिंतीसारखे

भक्कम असायला हवे होते, तेच सर्वांपेक्षा अधिक विखुरलेले आहेत. मुसलमानांची दृष्टी आपल्या चुकांवर व उणिवांवर कधी पडत जरी असली, तरी ईश्वराची प्रार्थना आणि सुप्रसिध्द नैतिक त्रुटींपासून अलिप्तता, यांच्यापुढे त्यांची मजल जातच नाही. फारच थोड्या मुसलमानांची दृष्टी त्या मर्यादेपर्यंत पोहोचते की, सर्वप्रथम ते काही सिध्दन्तांचे अनुयायी आहेत आणि ईशमार्गदर्शनाचे (हिदायते इलाही) विश्वस्त (अमीन) आहेत. आमचे सर्वप्रथम कर्तव्य हे आहे की या शिकवणीचा जगातील सर्व लोकांपर्यंत प्रसार करावा. म्हणून आम्ही स्वतः ईश्वराची आराधना करीत राहावे व नीतीमत्तेवाले बनून राहावे एवढेच पुरेसे नाही. याच्याही पुढे जाऊन आम्हाला नैतिकतेचे शिक्षक व रक्षक व्हायला हवे. काही भौतिक लाभासाठी आणि काही आदर-प्रतिष्ठेसाठी संघर्ष करण्यात आणि लढण्या-मरण्यात आपली सर्व शक्ती खर्ची घालण्यासाठी आमचे जीवन नाही. किंबहुना ज्या सिध्दान्तावर आम्ही श्रध्दा (ईमान) धारण केली, त्यांच्या खातर आपल्या प्राणांचे बलिदान करण्याची शक्ती स्वत:मध्ये निर्माण करणे आणि पक्षहिताच्या वर येऊन, मानवतेची सेवा करण्याचे आपले लक्ष्य बनवून कार्य करावे आणि अशा प्रकारे स्वत:ला दु:खी मानवजातीचा मुक्तीदाता सिध्द करावे.

# मुसलमान, देशाची आवश्यकता ठरु शकतात

या समयी भारत देश सैध्दान्तिक व व्यावहारिक गदारोळाच्या वावटळीत आहे. अशी अवस्था कोणत्याही देशात, एक निश्चित दिशा घेण्याआधी होत असते. एका बाजूला युरोपचे भौतिकवादी विचार व दृष्टिकोन आहेत, जे या देशावर लादले जात आहेत आणि याच विचारांवर आधारित व्यावहारिक पध्दती बनल्या आहेत. राजकीय सत्तेच्या बळावर या देशाला त्यांच्या मुशीत ओतले जात आहे. दुसऱ्या बाजूला देशाची प्राचीन, धार्मिक व नैतिक प्रकृती आहे. या प्रकृतीचे जठर अद्याप नास्तिकवादाची व भौतिकवादाची माशी पचवू शकण्यास पूर्णतः तयार नाही. नंतर धार्मिक स्वभाव असलेल्या जाती, काही कारणास्तव देशासमोर अशी गोष्ट माडण्यात असफल ठरल्या आहेत. ज्याची आवश्यकताही आहे आणि मागणीही आहे. त्या गोष्टीच्या आधारावर एखादी अशी व्यवस्था स्थापित व्हावी, जिच्यामुळे लोकांची भौतिक भूकही भागावी आणि त्यांची नैतिक व आध्यात्मिक तहानही शमली जावी. या गोष्टींच्या अभावाने देशात असंख्य गुंतागुंतीच्या समस्या निर्माण करुन सोडल्या आहेत आणि संपूर्ण देश भांबावलेल्या अवस्थेत उभा आहे.

या संधीत पुढे सरसावून ती उणीव भरुन काढणे मुसलमानांचे काम होते, कारण त्यांच्यापाशी ती गोष्ट आहे, जिची देशाला आणि देशबांधवांना अत्यंत आवश्यकता आहे. पण दु:खाची बाब अशी की देशातील गुंतागुंततीच्या समस्या सोडविणारे होण्याऐवजी, मुसलमान स्वत:च एक समस्या बनून राहिले आहेत. मुसलमानांनी आपले कर्तव्य पार पाडण्याचे सोडून दिले आणि सारा भारत देश काटेरी झुडुपांनी व्यापून गेला आणि सर्वाधिक काटेरी भाग खुद्द त्यांच्या वाट्याला आला आहे.

मुसलमानांच्या वर्तमान स्थितीचे विवेचन करताना एका विचारवंताने त्यांना अगदी सत्य असे सांगितले आहे की 'तुमचा वर्तमानकाळ वा तुमचा भविष्यकाळ या प्रश्नावर अवलंबून आहे की ईश्वराच्या प्रेषिताकरवी, तुम्हापर्यंत पोचलेल्या ईशमार्गदर्शनाशी तुम्ही कोणत्या प्रकारचा व्यवहार करीत आहात, ज्या मार्गदर्शनासाठीच तुम्हाला मुसलमान म्हटले जाते? त्या मार्गदर्शनाचे जर तुम्ही अचूक अनुसरण केले आणि तुमच्या सामूहिक जीवनात जर संपूर्ण इस्लामचे प्रतिबिंब उमटू लागले, तर तुम्ही जगात विजय प्राप्त कराल, तसेच परलोकात सफलता मिळवाल. भय, अनादर, पराजय व पारतंत्राचे जे काळे ढग तुमच्या डोक्यावर गोळा झाले आहेत ते बघता बघता निघून जातील. तुमच्याकडून न्यायाची आशा केली जाईल, तुमच्या सत्यप्रियतेवर आणि

प्रामाणिकपणावर विश्वास टाकला जाईल. तुमचे कथन सत्याचे प्रमाण मानले जाईल. तो काळ आठवण म्हणून इतिहासात एखाद्या कथा-कहाणीच्या स्वरुपात राहील की इस्लामसारख्या विश्वविजयी शक्तीचे अनुयायी कधी काळी इतके मूर्ख बनले होते की 'मुसा' (अलै) ची काठी (असा) त्यांच्या हातात असताना ते जादुगारांच्या काठ्यांना आणि दोरांना पाहून भयाने थरथर कापत होते.

# उपद्रवातून कल्याण

मुसलमानांच्या सर्व समस्यांचे वास्तविक निराकरण यात आहे. त्यांच्या तात्कालिक आणि प्रासंगिक समस्यांचे तसेच निरंतरच्या जातीयवादाच्या समस्यांचेही हेच निराकरण आहे. नि:संशयपणे देशाच्या समस्यांचा तोडगाही हाच आहे. त्यांच्यावर जी निरनिराळी संकटे येऊन कोसळत आहेत, ती एकीकडे त्यांनी आपले वास्तविक कर्तव्य विसरुन टाकले, या निष्क्रियतेची ती शिक्षा आहे आणि दुसरीकडे त्यांना खडबडून जागृत केले जात आहे. आता तरी सावरून सावध व्हा आणि आपले कर्तव्य पार पाडा नाही तर तुम्हाकडे दुर्लक्ष केले जाईल.

लोकसमूहात जिवंतपणा व चेतना असेल, तर असे हादरे त्यांना जागे करुन सोडतात. अशा दुर्घटनातून लाभ घेण्याची त्यांच्यात क्षमता जर असेल, तर ते जागे होऊन, याच दुर्घटनांना उन्नतीची पायरी (शिडी) करुन टाकतात. भडकणारा अग्नी वाऱ्याच्या झोताने जास्त भडकतो, परंतु मिणमिण जळणारा दीप त्याच वाऱ्याने विझुन जातो. आता तुम्ही भडकणारा अग्नी व्हायचे की मिणमिणणारा व विझणारा दीप व्हायचे हा तुमच्या अखत्यारीतील प्रश्न आहे. या उपद्रवामुळे कल्याणाची उत्पत्ती होऊ लागली आहे आणि त्यासाठी ईश्वराचे जितके आभार मानावे तितके कमीच आहेत. आता मुसलमान लोक वस्तुस्थितीवर गंभीरपणे विचार-चिंतन करु लागले आहेत. तिच्या गांभीर्याची जाणीव त्यांना झाली आहे आणि झोपेतही ते काही बरळू लागले आहेत.

एका पाठोपाठ एक असे धक्के बसल्याने त्यांचे डोळे उघडले आहेत. ते आपल्या वास्तविक कर्तव्यापासून दूर भरकटले आहेत, ही जाणीवही त्यांच्यात जागृत होऊ लागली आहे. संपूर्ण संघटन करण्याच्या आवश्यकतेची जाणीवही त्यांच्यात उत्पन्न होऊ लागली आहे. त्यांच्या मनात आपल्या अन्न-वस्त्राच्या विवंचनेच्या पुढे जाऊन काही तरी करायला हवे, हा विचारही कधी शिवला नाही, त्यांनाही संघटनेच्या आवश्यकतेची जाणीव होऊ लागली आहे. त्यांच्यात अनेक अशी माणसे आहेत की एका हाकेवर ओ देण्याची कळकळ त्यांच्या अंत:करणात आहे, त्यांच्या स्वभावाशी जुळणारी हाक त्यांच्या कानी पडत नाही. आता 'मुस्लिम समुदाया'च्या ज्येष्ठ व्यक्तींचे हे कर्तव्य आहे की अशा नाजुक प्रसंगी त्यांनी 'मिल्लत'ला उचित मार्गदर्शन करावे आणि वाईटातून चांगले निघण्याचा जो पैलू समोर येत आहे, उम्मतमध्ये एक प्रकारची तहान निर्माण झाली आहे, तिच्या तृप्तीची तरतूद करावी. देशव्यापी पातळीवर मुस्लिमांना असा कार्यक्रम द्यावा की ते पालापाचोळ्याप्रमाणे उडवून दिले जावू नयेत. त्यांना जीवनशक्तीही प्राप्त व्हावी आणि त्यांनी देशासाठी उपयोगी सिध्द व्हावे.

# तात्कालिक व स्थानीय उपाय

वर वर्णन केलेले कार्य, हेच खरे कार्य आहे, परंतु तात्कालिक व स्थानिक पातळीवर करण्याची काही कामे अशी आहेत, ज्यावर सहानुभूती बाळगणाऱ्या लोकांनी लक्ष ठेवायला हवे.

१. दंगलग्रस्त क्षेत्रात साधारणत: भीतीचे व हालअपेष्टांचे वातावरण बनते आणि भल्याभल्या माणसांची मती कुंठित बनते. त्याचप्रमाणे काही अतिउत्साही माणसे भावनेच्या भरात एखादे अनुचित कृत्य करुन टाकतात. या दोन्ही गोष्टींपासून धोका संभवतो अशी अवस्था दूर करण्याचे ठोस प्रयत्न व्हायला पाहिजेत. या बाबतीत मूळ गोष्ट तर ईश्वरावर भरवसा असला पाहिजे, परंतु त्याचबरोबर अन्य काही गोष्टीही या प्रयत्नात सहाय्यभूत ठरतात. उदाहरणार्थ, ऐकण्यात आलेल्या प्रत्येक अफवेवर विचार केल्याविना विश्वास केला जाऊ नये, आपल्या चुकांवरही लक्ष ठेवणे, विरोधी पक्षाच्या भूमिकेतून दंगलीसंबंधी विचार करणे, चित्राच्या दोन्ही बाजू पाहणे, कृती करणारे हात मूळ नसून, कृती करायला लावणारी मस्तके, मूळ आहे. हे दृष्टीसमोर ठेवायला हवे. अशा प्रकारच्या गोष्टी दृष्टीसमोर ठेवल्याने मानसिक समतोल राहातो आणि समस्येच्या मुळापर्यंत पोहोचण्यास मदत होते.

२. विरोधी पक्षाकडे स्वत: होऊन मैत्रीचा हात पुढे करणे फार कठीण काम आहे. एखादा माणूस हातात लाठी घेऊन तुमच्या अंगावर धावून येतो तेव्हा तुम्ही त्याला प्रेमाने आलिंगन देण्यासाठी समोर जाणे ही मोठ्या शौर्याची गोष्ट आहे. सत्य असे आहे की त्यापेक्षा अधिक परिणामकारक तलवार अद्याप निर्माण होऊ शकलेली नाही. असे करण्याचे साहस असेल तर 'खोडसाळपणात स्पर्धा' करण्याऐवजी 'सज्जनपणात स्पर्धा' करण्याचा आरंभ होऊ शकतो. तथापि ही गोष्ट नीट लक्षात ठेवावी की बरोबरीच्या दर्जाने मैत्रीचा हात पुढे करणे आणि निराशेने शरणागत होणे, यात मोठा फरक आहे. आपले अस्तित्व दुसऱ्याच्या अधीन करणे, यात सज्जनपणाही नाही किंवा औदार्यही नाही.

३. आपसात सहानुभूतीची व सहाय्य करण्याची भावना वाढविणे, दान करण्यास सदैव तत्पर राहाणे, कोणत्याही आधारशिवाय स्वत:च्या पायावर उभे राहाण्याचा दृढ संकल्प करणे, हे आपले कर्तव्य आहे. त्याचप्रमाणे अधिकांश वाईट गोष्टींचे जे मूळ आहे, ती स्वार्थपरायणता, हट्टीपणा व दुही आणि फाटाफूट

दूर करणे आपले अनिवार्य कर्तव्य ठरते. संघटन व नेतृत्वाचे केंद्र नसल्याची केवळ जाणीव व त्याबद्दल केवळ गाऱ्हाणी करुन अगर तसे केंद्रस्थान स्थापण्याची केवळ अभिलाषा बाळगणे पुरेसे नाही. यासाठी प्रांजळपणे प्रयत्न आवश्यक आहे, हे मनावर चांगल्या रीतीने बिंबविले पाहिजे. कोणतेही नेतृत्व आकाशातून पडत नाही. आपल्यातूनच ते उदयाला येईल. त्यासाठी उच्छृंखलपणा सोडून, स्वत:ला संघटनेच्या चौकटीत बांधून घेण्याची तयारी ठेवायला हवी.

४. वरील उद्दिष्टांची पूर्तता होण्यासाठी प्रत्येक मोहल्ल्यात समिती स्थापन होणे आवश्यक आहे. या समितीकडे 'जकात' व 'दान' यांची सामूहिक रीतीने वसुली करण्याची जबाबदारीही सोपविली जावी. 'बैतुल-माल'ची स्थापना केली जावी. आपल्या कार्यक्षेत्रात शांतता व सलोखा राहील व अशांतता व उपद्रव दाबला जाईल, असे जनमत त्यांनी निर्माण करावे. अशा चांगल्या उद्दिष्टांसाठी तयार करणे आणि त्यांनाही सहकार्य देणे गरजेचे आहे. या संदर्भात एक गोष्ट लक्षात ठेवणे आवश्यक आहे की हंगामी परिस्थितीत ज्या शांतीसमित्या स्थापन केल्या जातात, त्यात अधिकांश माणसे तीच असतात ज्यांनी दंगलखोरांची पाठराखण केलेली असते. या समित्यांना एखाद्या राजकीय पक्षाच्या निवडणूक प्रचाराचे साधन केले जाते. म्हणून अशा शांति-समित्या शांतता प्रस्थापित करण्यासाठी साधरणत: काहीच सहाय्यकारक ठरत नाहीत. अशा समित्यांमध्ये त्याच लोकांना घेतले पाहिजे जे फार प्रख्यात नसू देत, परंतु स्वहित व पक्षहितापासून वर येऊन केवळ सेवाभावाने व निखालस ईशसेवेच्या भावनेने कार्य करण्याचे त्यांच्यात धैर्य असावे. ही गोष्ट तेव्हाच शक्य होईल, जेव्हा भल्याबुऱ्याची पारख करणारी नीर-क्षीर वृत्तीची ओळख आम जनतेला होईल.

५. मदत कार्य नियमितपणे केले जावे अथवा सहानुभूती बाळगणाऱ्या स्वयंसेवी लोकांनी ते कार्य करावे. दंगलपीडितांमध्ये आपल्या जातीचे कोण आहेत आणि दुसऱ्या जातीचे कोण आहेत, या हीन भावनेने हे सेवाभावी कार्य कधीही गलिच्छ करु नये. ज्या कोणावरही जुलूम-अत्याचार झालेला आहे. तो सच्चा मनाच्या व नि:पक्षपाती माणसाच्या सहानुभूतीस व मदतीस पात्र आहे. त्याचप्रमाणे धर्म व जातीचा विचार न करता, अत्याचार करणारांनाही मदत केली जावी. त्यांची मदत अशी करायची की त्यांना अत्याचार करण्यापासून

रोखण्याचे ठोस प्रयत्न करायला हवेत.

६. साधारणतः दंगलींचा शेवट, पोलिसांनी खटले भरल्यावर होतो. ते टाळणे तर शक्य नाही. सर्वसाधारण पोलीस प्रकरणात ज्या मार्गाचा अवलंब केला जात असतो, ते जातीय दंगलीसंबंधी खटल्यात कदापि वापरले जाऊ नयेत. खोटे बोलणे, बनावट साक्षीदार हजर करणे, अथवा आपल्या चुकांवर पांघरुण घालण्यापेक्षा, खरे बोलून शिक्षा भोगणे हजारपटीने चांगले आहे. ज्या माणसात सत्यावर ठामपणे राहण्याची शक्ती असते, तेच मैदान मारु शकतात. काही ताजी उदाहरणे अशी आढळून आली आहेत की काही धैर्यवान माणसांनी सत्य व निःपक्षपाती जबाब देऊन न्यायालयालाही आश्‍र्चचकित केले आणि विरुध्द पक्षाच्या लोकांच्या माना खाली गेल्या.

हे काही विचार आहेत, ज्यावर सर्वांनी विचार करावा असे आम्हाला वाटते. सामान्य परिस्थितीतही ते विचार करण्यायोग्य आहेत आणि दंगलीच्या तणावग्रस्त अवस्थेत तर ते कार्यान्वित करणे अत्यंत निकडीचे आहे. सामान्य परिस्थितीतच ते कार्यान्वित करण्याचा प्रबंध केला गेला, तर (ईश्वरी इच्छा असल्यास) तणावाची परिस्थिती निर्माण होण्याची वेळच येणार नाही. निष्कर्ष अनेक असू शकतात, परंतु सत्य असे आहे की मूळ गोष्ट हे निष्कर्ष नव्हे, हे सोनेरी सिध्दान्त नव्हेत अगर कार्यक्रमही नव्हेत. तर मूळ गोष्ट आहे अंतःकरणाची ओढ, ईमानची तळमळ, सेवाभावना व सत्यावर दृढपणे राहाण्याचे धैर्य. ईश्वरी कृपेने आपल्या समाजात या गुणांची उणीव नाही. उणीव आहे ती केवळ संघटित होऊन कार्याला वाहून घेण्याची!

*** समाप्त ***